अधिक्रमित झालेल्यांना पूर्वीलक्षी प्रभावाने पदोन्नती देण्यासंबंधीचे स्पष्टीकरण....

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग,
परिपत्रक ज्ञापन क्र.एसआरव्ही/१०८२/बारा,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- १४ सप्टेंबर, १९८२.

वाचा :- १) शासन परिपत्रक ज्ञापन,सा.प्र.वि.क्र.एसआरव्ही-१०६४-डी,दि.२५-२-१९६५
२) शासन परिपत्रक ज्ञापन,सा.प्र.वि.क्र.एसआरव्ही-१०६९-डी,दि.९-९-१९६९
३) शासन परिपत्रक ज्ञापन,सा.प्र.वि.क्र.एसआरव्ही-१०७९/बारा, दि.२४-१०-१९७९

## परिपत्रक ज्ञापन

शासनाच्या सामान्य प्रशासन विभाग,क्र.एसआरव्ही-१०७९/१२, दिनांक २४.१०.७९ च्या परिपत्रक ज्ञापनानुसार असे आदेश देण्यात आले आहेत की, एखाद्या प्रकरणी जर कर्मचाऱ्यांच्या पदोन्नतीस प्रशासकीय कारणास्तव विलंब झाला असेल, तर त्याला पदोन्नतीचा त्याच्या निकटच्या कनिष्ठ कर्मचाऱ्यांच्या प्रत्यक्ष पदोन्नतीच्या दिनांकाच्या आधारे मानीव दिनांक देण्यात यावा, आणि त्यास शासन परिपत्रक ज्ञापन, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक-एसआरव्ही/१०६४-डी. दिनांक २५.२.१९६५ मधील परिच्छेद ३ मधील आदेशानुसार त्या पदाचे देय वेतन व भत्ते थकबाकीसह देण्यात यावे. या आदेशाच्या संदर्भात विस्ताराने स्पष्टीकरण करतांना शासन असे स्पष्ट करते की, जर प्रशासकीय विलंब तीन महिन्यापेक्षा अधिक कालावधीचा असेल तरच परिपत्रकांमध्ये आदेशीत केल्याप्रमाणे संबंधीत कर्मचाऱ्यास पदोन्नतीचा मानीव दिनांक आणि परिणामी देय वेतन व भत्ते यांचा फायदा थकबाकीसह देण्यात यावा.

२. शासन आणखी असा खुलासा करीत आहे की जर कनिष्ठ कर्मचाऱ्यांना प्रशासकीय कारणास्तव थोड्या कालावधीसाठी आकस्मिक (Fortuitous) पदोन्नती देण्यात आल्या असतील तर अशा प्रकरणी वरील संदर्भाधीन आदेश लागू होणार नाहीत.

हे आदेश वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१०५९५, दिनांक १६.८.१९८२ च्या संमतीने निर्गमित करण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशाने व नावाने.

सही/-
( व. अ. कोटेश्वर )
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,
राज्यपालांचे सचिव,
मुख्यमंत्र्यांचे सचिव,
महालेखापाल, महाराष्ट्र १, मुंबई
महालेखापाल, महाराष्ट्र २, नागपूर
अधिदान व लेखा अधिकारी मुंबई
निवासी लेखा परीक्षा अधिकारी
वित्त विभाग,
सर्व मंत्रालयीन विभाग

D:\Desk 12\G R 14-9-1982